**नामनिर्देशनाने नियुक्ती**
**सहयोगी प्राध्यापक**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र नियुक्ती -२०११/(२७४/११)/मशि-१,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.**
**दिनांक :- १२ डिसेंबर,२०११.**

वाचा :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र -१. १५(१)(१९२)/४३५६/सात, दि. १३/१०/२०११.
२. १५(१)(१८७) (१९०) (१९१)/४३५६/सात, दि. १४/१०/२०११.
३. १५(१)(१८६) /४३५६/ सात, दि. १५/१०/२०११.
४.१५(१)(१४२)/४३५६/सात, दि.१७/१०/२०११.
५.१५(१)(१४९)/४३५६/सात, दि.१८/१०/२०११.
६. १५(१)(१८४)/४३५६/सात, दि.२४/१०/२०११.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवारांची सहयोगी प्राध्यापक, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट 'अ' अ या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | विषय | नियुक्तीचा प्रवर्ग | आयोगाने दिलेला गुणवत्ता क्रमांक | पदस्थापनेचा तपशिल |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. प्रशांत पंडीतराव मगर | भूगोल | अराखीव | १ | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती |
| २ | श्रीमती देबजानी फनी भुषणदत्ता | जीवरसायन शास्त्र | अराखीव | १ | शासकीय विज्ञान संस्था, मुंबई |
| ३ | श्रीमती अनुपमा दिनदयाल देशराज | इंग्रजी | अराखीव | १ | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती |
| ४ | श्री. घनःश्याम सुबराव महाडीक | इतिहास | अराखीव | १ | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती |
| ५ | श्रीमती मंजु रमेशपंत वाठ | वनस्पतीशास्त्र | अराखीव (महिला) | ४ | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती |
| ६ | श्री. अभय नारायण साळवे | वनस्पतीशास्त्र | अ. जा. | ६ | शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद |
| ७ | श्री सुशीलकुमार भास्कर चौधरी | प्राणीशास्त्र | अराखिव | २ | शासकीय विज्ञान संस्था, मुंबई |

सर्व संबंधित प्राचार्य/संचालक, महाविद्यालये/संस्था

वरील उमेदवाराच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी संस्थाप्रमुखांनी स्वतः करावी व सदर उमेदवारास हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल सहसंचालक व संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),१, मुंबई/नागपुर

संबधीत जिल्हा कोषागार अधिकारी.

संबंधित उमेदवार

१. श्री. प्रशांत पंडीतराव मगर, बी-२०३, दत्तविहार हौसिंग सोसायटी, दत्तनगर, आंबेगांव (बु.), पो.कात्रज , जि.पुणे. -४११ ०४६

२. श्रीमती देबजानी फनी भुषणदत्ता, एच-२०४, ग्रेट इस्टर्न गार्डन, एल.बी.एस.मार्ग, कांजुरमार्ग - पश्चिम, मुंबई.-४०० ०७८.

३. श्रीमती अनुपमा दिनदयाल देशराज,देशराज मॅन्शन, पहिला मजला, साऊथ फेसींग, सदर, नागपुर जि. नागपूर ४४० ००१.

४. श्री. घनःश्याम सुबराव महाडीक , मौली निवास, टॉवर लाईन रोड, वीर तानाजीनगर, अमरावती जि.अमरावती - ४४४ ६०४.

५. श्रीमती मंजषा रमेशपंत वाठ, c/o. श्री. येवतकर, डॉ.लांडगे हॉस्पीटलजवळ, विद्युतनगर, अमरावती जि. अमरावती ४४४ ६०४

६. श्री. अभय नारायण साळवे, २ BA सारस राजघर, आंध्ले चौरे नगर, हॉटेल अरुणच्या मागे, एम.आय.डी.सी. अहमदनगर जि.अहमदनगर ४१४ ००१.

७. श्री. सुशीलकुमार भास्कर चौधरी, बी-७०४, श्री. साई टॉवर, सोडावाला लेन, बोरीवली (प.), मुंबई ४०० ०९२.

८. श्री दिपक तुकाराम तायडे, श्यामनगर (लास्ट लाईन) पो.रुक्मीणीनगर, अमरावती जि.अमरावती ४४४ ६०६

९.. श्रीमती अंजली अशोक नंदनपवार, १६०, लेन्ध्रा, नंदाजी बाबा मंदीराजवळ, रामदासपेठ, नागपुर जि. नागपूर ४४० ०१०

१०. श्रीमती चंदना मोहनराव कांबळे, अंबिका कॉलनी, सोमनाथपुर, ता. उदगीर जि. लातुर ४१३ ५१७

निवड नस्ती.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८ | श्री दिपक तुकाराम तायडे | रसायनशास्त्र | अराखीव | ३ | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती |
| ९ | श्रीमती अंजली अशोक नंदनपवार | रसायनशास्त्र | अराखीव (महिला) | ६ | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर |
| १० | श्रीमती वंदना मोहनराव कांबळे | रसायनशास्त्र | अराखीव (महिला) | ८ | शासकीय विज्ञान संस्था, मुंबई |

२. उपरोक्त उमेदवाराची सहयोगी प्राध्यापक, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (महाविद्यालयीन शाखा) या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) उपरोक्त उमेदवाराची वेतनश्रेणी रु. ३७४०० - ६७००० श्रेणी वेतन ९००० अशी राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता,घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) उपरोक्त उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) उपरोक्त उमेदवाराचे परिवीक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य,अपेक्षित दर्जाचे अथवा अननुरुप असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यास अथवा सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७/८/२००० अन्वये शासनसेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. उपरोक्त उमेदवाराने शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र **नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत** उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

६) उपरोक्त उमेदवाराची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

७) उपरोक्त उमेदवाराची नियुक्ती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असून त्यांच्या चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणीचा अहवाल असामाधानकारक असल्याचे निर्दशनास आल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता **एक महिन्याची नोटीस** देऊन समाप्त करण्यात येईल.

८) महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम , १९८१ मधील नियम ११ (१) अन्वये उपरोक्त उमेदवाराने नियुक्तीच्या तारखेपासून त्याची सहा महिन्याची सेवा पूर्ण होण्यापुर्वी आरोग्याबद्दलचे वैद्यकीय प्रमाणपत्र दाखल करणे बंधनकारक राहील.

९) उपरोक्त उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात येईल.

१०) परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून **एक महिन्याच्या आत** तात्काळ रुजु व्हावे.सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत काहीही कळविले नाही तर त्यांचे नांव,कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

११) शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर,२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.१ नोव्हेबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.१ नोव्हेबर,२००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्रमांकः अंनियो-१००६/८७/सेवा-४,दि.१२ जानेवारी,२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबधीत शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन), नियम,१९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील.दि.१८/८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल,अशा शासकीय कर्मचा-यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना लागू ठरेल.

१२) उपरोक्त उमेदवाराचे प्रचलित नियमानुसार सेवानिवृत्तीचे वय शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१०/(५०३/१०) विशि १, दि.०५.०३.२०११ मधील विहित अटींच्या अधीन राहून ६२ राहील.

१३) श्री. मानेकर यांच्या मूळ अर्ज क्र. ४२६/२००८ वरील न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने शासनाने मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे अपील क्र. ९६७३/२००९ दाखल केले आहे त्यावर मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या अंतरिम आदेशास अनुसरुन सदर नियुक्त्या देण्यात येत आहेत. मात्र, या नियुक्त्या मा.उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून करण्यात येत आहेत.

१४) उपरोक्त उमेदवाराना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१५) उपरोक्त उमेदवारानी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

३. हे आदेश प्राप्त होताच संबंधीत उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधीत संस्थाप्रमुखांकडे सादर करावा.संस्थाप्रमुखांनी याबाबतचा अहवाल संचालकांमार्फत शासनास सादर करावा.

४. सदर उमेदवाराच्या नियुक्तीबाबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११२१३०६२१११८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

र.बा.मयेकर

( र.बा.मयेकर )

अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई(पत्राव्दारे)

सर्व संबंधित विभागीय सहसंचालक

D:\Bapat\२०११\Appointment\Associate pro\G.R.doc